कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या मुदतपूर्व/ विनंती बदल्यांबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एलटीएस ११२२/प्र.क्र.२९४/२०२२/आ (वर्ग-१)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०५ जुलै, २०२३.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियम, २००५ च्या कलम ४(४) व ४(५) मधील तरतुदीनुसार, जलसंपदा विभागातील कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गातील अधिकाऱ्यांची प्रशासकीय कारणास्तव, नागरी सेवा मंडळाच्या शिफारशीनुसार व सक्षम प्राधिकरणाच्या मान्यतेने खाली दर्शविल्याप्रमाणे बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | सध्या धारण करीत असलेले पद | बदलीने पदस्थापनेचे पद |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री.उमेश विश्वनाथराव वानखेडे | कार्यकारी अभियंता, बीड पाटबंधारे विभाग, बीड. | कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग क्र. १, औरंगाबाद |
| २. | श्री.धनंजय मारुती गोडसे | कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग क्र.१, औरंगाबाद. | कार्यकारी अभियंता, बीड पाटबंधारे विभाग, बीड |

२. विनंती बदलीच्या अनुषंगाने बदलीच्या पदावर रुजू होण्याकरिता संबंधित अधिकाऱ्यांना प्रवास भत्ता अनुज्ञेय राहणार नाही.

३. संबंधीत अधिकाऱ्यास नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास **doesttclass1.wrd@maharashtra.gov.in** या ई-मेल संकेतस्थळावर त्वरित कळवावे.

४. संबंधीत अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्व परवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच, म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्याचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत, असे अर्ज प्राप्त झाल्यास, ते संबंधीत अधिकाऱ्यास मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिकाऱ्याचे रजेचे अर्ज पाठविल्यास सदर अर्जांची दखल घेण्यात येणार नाही.

५. सदरहू बदली आदेशानुसार तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६. सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेताक क्रमांक २०२३०७०५१९२३१७७५२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे. तसेच सदर शासन आदेश जलसंपदा विभागाच्या www:/wrd.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAKHI SACHIN CHAVAN

Digitally signed by RAKHI SACHIN CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=7206b9312f3f73ff523e7a493d6d53d819f5c15336ff9a16ada11a287b879985, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=75AA5A95E2FE606BB64628D64D984EA9D651466BF93A6A2C44EEC93DF9207974, cn=RAKHI SACHIN CHAVAN
Date: 2023.07.05 19:28:34 +05'30'

**( राखी चव्हाण )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.उप मुख्यमंत्री (जलसंपदा) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (जलसंपदा) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. सचिव (लाक्षेवि) / सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. महासंचालक व सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
६. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
७. सर्व सह सचिव/ उप सचिव/ मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई..
८. महालेखापाल, महाराष्ट्र १/ २ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा), मुंबई/ नागपूर.
९. सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
१०. सर्व कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग.
११. संबंधीत अधिकारी.
१२. संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी.
१३. सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. कार्यासन आ (वर्ग-१), संग्रहार्थ.